राज्यसेवा परीक्षा-२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या मोटार वाहन विभागाच्या अधिनस्त कार्यरत गट-अ (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) करिता अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक एमव्हीडी-०३२५/प्र.क. ८४/परि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४००० ०३२.
दिनांकः ३० एप्रिल, २०२५.

वाचा :-

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ. दि.२०.०१.२०१४.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०.०२.२०१६.

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. टिआरएन-०५१७/प्र.क्र.३६/सीपीटीपी, दि.२१.०७.२०१७ व दि. २५.०९.२०१९.

४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. टिआरएन-०८२२/प्र.क्र. ५८/सीपीटीपी, दि.१३.०९.२०२२

५) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्र. १४७७(२)/२०२२/वीस, दि.२५.१०.२०२४ चे पत्र.

६) सामान्य प्रशासन विभाग, कार्यालयीन आदेश क्र. टिआरएन-११२४/प्र.क्र.८४/प्रशि-२ दि.२१.०२.२०२५

७) उपमहासंचालक तथा संचालक, सीपीटीपी, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे यांचे पत्र क्र. सीपीटीपी प्रशासन/वेळापत्रक/सीपीटीपी तुकडी-१०, दि.०३.०३.२०२५

८) संचालक (सीपीटीपी), वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांचे दि.०९.०४.२०२५ रोजीचे पत्र.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-ब संवर्गातील पदांसाठी सन २०१४ पासून वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षाच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम वाचा क्र.१ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाने वाचा क्र.५ च्या आदेशान्वये मोटार वाहन विभागाच्या अधिनस्त कार्यरत सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परिक्षा २०२२ च्या अंतिम निकालाच्या

आधारे निवड झालेल्या उमेदवारांना एकत्रित परिवीक्षाधीन कार्यक्रम (सीपीटीपी-१०) अंतर्गत परिविक्षाधीन सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी (गट-ब) या पदावर प्रशिक्षणार्थी अधिकारी म्हणून नियुक्ती दिलेली आहे  व या प्रशिक्षणासाठी रूजू झालेल्या उमेदवारांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याच्या सूचना दिल्या आहेत.  सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी हे पद यापूर्वी गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील पद होते. शासन अधिसूचना, गृह विभाग क्र. एमव्हीडी-०९१३/ प्र.क्र.३२१/परि-४, दि.१६.११.२०२२ अन्वये सदर पदाचे सुधारित सेवाप्रवेश निर्गमित करण्यात आले असून त्यानुसार सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी हे पद गट-अ (राजपत्रित) आहे.  सामान्य प्रशासन विभागाच्या वाचा क्र.५ च्या आदेशान्वये प्रशिक्षणासाठी रूजू झालेल्या उमेदवारांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परिक्षा-२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व प्रत्यक्ष प्रशिक्षणासाठी रुजू झालेल्या मोटार वाहन विभागाच्या अधिनस्त कार्यरत गट-अ (राजपत्रित) ( पूर्वीचा गट-ब राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्याचे  ७ व्या वेतन आयोगानुसार S-१६: ४४९००-१४२४०० या वेतनश्रेणीत वित्त विभागाच्या वाचा क्र.२ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार दि.०२.०४.२०२५ ते दि.०१.०४.२०२७ या २ वर्षाच्या कालावधीकरिता १ अधिसंख्य पद निर्माण करण्याकरिता सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त वाचा क्र.५ येथील शासन आदेशातील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२.  सामान्य प्रशासन विभागाच्या वाचा क्र.५ येथील आदेशान्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) साठी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार सदर प्रशिक्षणार्थी अधिकाऱ्यांची सेवापुस्तके तयार करणे, सेवार्थ प्रणालीमध्ये नोंदणी करणे, त्यांचे एनपीएस करिता खाते उघडणे व तसेच अन्य अनुषंगिक बाबी पूर्ण करणे इ. कार्यवाही प्रशिक्षणाच्या सुरुवातीच्या ४ आठवड्यात करण्याच्या सूचना आहेत. सबब, सदर आदेशातील निर्देश विचारात घेऊन आवश्यक कार्यवाही करण्याकरीता उपायुक्त (प्रशासन), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई यांना नोडल अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

३.  सदर अधिसंख्य पदाच्या वेतन व भत्ते यावर येणारा खर्च “मागणी क्रमांक-बी-३, २०४१ वाहनांवरील कर, (१०२) मोटार वाहनांचे निरिक्षण (००) (००) (०१) मोटार वाहनांचे निरिक्षण (२०४१००८१) ०१-वेतन ( अनिवार्य)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२०२५, २०२५-२०२६ व २०२६-२०२७ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४.  सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०.०२.२०१६ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४३०१७२०४७६५२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL BABURAO APATE

Digitally signed by SUNIL BABURAO APATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=19ff433c24f38ac95f09eaa0a14f560224a1a78a80f8b940775fc013021ca5ca, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=4EA86DEC92091A126823D249DF451DF3C8D235CDD7E9111D7624C78A7C95B318, cn=SUNIL BABURAO APATE
Date: 2025.04.30 17:25:26 +05'30'

**( सु.बा.आपटे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२, (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे
६. संचालक (सीपीटीपी), वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, व्हीआयपी रोड, धरमपेठ, नागपूर-४४००१०.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१०. सामान्य प्रशासन विभाग (प्रशि-३) मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती (परि-४).